**नागरी जमिन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ च्या कलम २० अन्वये मंजूर केलेल्या गृहबांधणी व विशेष भूखंड योजनांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मुदत - २०१४/प्र.क्र.५९/नाजकधा-२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १८ फेब्रुवारी, २०१५.**

**संदर्भ :-** १) गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.युएलसी-१०९२/५२५८/कार्यासन १३, दि.१८/११/१९९२.
२) शासन निर्णय क्र.नाजक १००७/प्र.क्र.२२२/नाजकधा-२, दि.२३/११/२००७.
३) शासन निर्णय क्र.नाजक २२०९/प्र.क्र.१५/नाजकधा-२, दि.१६/०९/२०१०.

**प्रस्तावना:-**

नागरी जमिन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ च्या कलम २० अन्वये मंजूर केलेल्या गृहबांधणी योजना पूर्ण करण्यासाठी मुदतवाढ देण्याचे शासनाचे प्रचलित धोरण आहे. सदर अधिनियमाच्या कलम २० अन्वये मंजूर असलेली योजना विहीत कालावधीत सुरु अथवा पुर्ण न झाल्यास विलंबाची कारणे विचारात घेवून योजनांना विनादंडात्मक / दंडात्मक मुदतवाढ देण्यात येते. शासनाच्या सदरच्या प्रचलित धोरणानुसार दंडाची रक्कम वसूल करणे व योजने अंतर्गत शासनदेय सदनिका / क्षेत्र प्राधान्याने ताब्यात घेणे या अटी सापेक्ष आहेत.

नाजकधा अधिनियमाच्या कलम २० नुसार मंजूर असलेल्या योजनांना मुदतवाढ देताना आकारावयाच्या दंडाची रक्कम शासनाच्या दि.१६ सप्टेंबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये विहीत केली असुन त्यामध्ये रास्त कारणे व कारणे रास्त नसल्यास या बाबी विचारात घेवून आकारावयाची दंडाची रक्कम दंड आकारण्याची कार्यपध्दती निश्चित केली आहे.

नाजकधा अधिनियम, १९७६ च्या कलम २० अन्वये मुंबई, ठाणे, पुणे, उल्हासनगर, नाशिक, सांगली, कोल्हापूर, सोलापूर, नागपूर या ९ नागरी समुहातील मंजूर असलेल्या योजनेस मुदतवाढ देण्याचे अधिकार संबंधित सक्षम प्राधिकारी, नागरी समूह यांच्या स्तरावर दिल्यास योजनाधारकांच्या मुदतवाढीच्या प्रस्तावावर जलद गतिमान निर्णय घेणे शक्य होईल, याबाबीचा विचार करुन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

नागरी जमिन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ मधील कलम २० अन्वये मंजूर करण्यात आलेल्या गृहबांधणी व विशेष भूखंड योजनांची सत्वर अंमलबजावणी होण्यासाठी व योजनांना मुदतवाढ देण्याची प्रक्रिया सुलभ व गतिमान होण्याच्या दृष्टीने खालील अटी व शर्तीच्या अधिन फक्त दंडात्मक मुदतवाढ देण्याचे अधिकार संबंधित सक्षम प्राधिकारी, नागरी समूह, यांना प्रदान करण्यात येत आहे:-

१) शासन निर्णय दि.१६ सप्टेंबर, २०१० मध्ये नमुद केलेल्या खालील दरानुसार योजनांना दंडात्मक मुदतवाढ देण्यात येईल:-

(प्रती चौ.फूट प्रती वर्ष)

| अ.क्र. | नागरी समूह | गृहबांधणी योजना | विशेष भूखंड योजना |
|---|---|---|---|
| १. | मुंबई | रु.२०/- | -- |
| २. | ठाणे, नाशिक, पुणे, नागपूर, उल्हासनगर | रु.१०/- | रु.५/- |
| ३. | सोलापूर, सांगली, कोल्हापूर | रु.५/- | रु.५/- |

२) एका वेळी योजनेखालील सर्व क्षेत्रासाठी, मुदतवाढीच्या आदेशाच्या दिनांकापासुन एक वर्षाच्या कालावधीसाठी दंडात्मक मुदतवाढ देण्यात येईल.

३) योजनाधारकास मुदतवाढ मंजुर करण्यापूर्वी, त्या योजनाधारकास यापुर्वी दिलेल्या मुदतवाढीच्या दंडाची पुर्ण रक्कम शासनास जमा केल्याची खात्री केल्यानंतरच पुढील मुदतवाढ देण्यात येईल.

४) योजनेअंतर्गत शासनदेय सदनिका / क्षेत्र प्राधान्याने ताब्यात घेतले जाईल.

५) नाजकधा कलम २०अन्वये मंजुर केलेल्या योजना अद्यापही अपूर्ण असल्याने व त्या तात्काळ पूर्ण करणे आवश्यक असल्याने, मुदतवाढीसाठी योजनाधारकाने अर्ज सादर केल्यानंतर १५ दिवसाच्या कालावधीत योजनेस मुदतवाढ देण्यात येईल. मुदतवाढ देण्यात आलेल्या आदेशाची एक प्रत शासनास सादर करावी.

६) प्रत्येक नागरी समुहात मंजूर असलेल्या योजनांच्या प्रगतीचा व मुदतवाढीचा प्रतिमाह अहवाल शासनास सादर करण्यात येईल.

वरील अटी व शर्तीच्या अधिन सर्व सक्षम प्राधिकारी नागरी समूह यांनी त्यांच्या स्तरावर दंडात्मक मुदतवाढीच्या प्रस्तावावर तात्काळ कार्यवाही करावी. तथापि राज्यातील सर्व नागरी

समुहातील विनादंडात्मक मुदतवाढीच्या प्रस्तावास मान्यता देण्याचे अधिकार शासन निर्णय दि.१८/११/१९९२ मध्ये नमुद केल्याप्रमाणे शासनाकडे कायम ठेवण्यात येत आहेत.

ज्या योजनेत शर्तभंग आढळला असेल किंवा योजनेत काही फेरफार करावयाच्या असेल (उदा.एकत्रिकरण किंवा योजनेचे रुपांतरण) अशा योजनेच्या मुदतवाढीचे प्रकरण शासनाकडे सादर करण्यात यावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१८१२०७४३६३२५ आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam Karbasayya Salimath

Digitally signed by Siddharam Karbasayya Salimath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam Karbasayya Salimath
Date: 2015.02.18 17:18:55 +05'30'

**(एस.के.सालीमठ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

५) मा.प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुबई.

६) अप्पर जिल्हाधिकारी व सक्षम प्राधिकारी, मुंबई / पुणे / नागपूर / नाशिक / ठाणे.

७) उपजिल्हाधिकारी व सक्षम प्राधिकारी, उल्हासनगर / सोलापूर / कोल्हापूर / सांगली.

८) उप सचिव (नाजकधा) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) कक्ष अधिकारी (नाजकधा-१, २, ३), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती (नाजकधा-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.